राज्यातील रासायनिक व धोकादायक कारखान्यांचे औद्योगिक सुरक्षिततेच्या दृष्टीकोणातून सुरक्षा परीक्षण (SAFETY AUDIT) व उपाययोजना सुचविण्याबाबत जिल्हानिहाय समिती गठित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- एफएसी-२०२०/प्र.क्र.१८/कामगार-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १७ जानेवारी, २०२०

**प्रस्तावना :-**

तारापूर औद्योगिक वसाहत जि.पालघर येथील मे.ए.एन.के फार्मा प्रा.लि., प्लॉट नं.एम-२, बोईसर, जि.पालघर या कारखान्यात दिनांक ११.०१.२०२० रोजी स्फोट होऊन झालेल्या दुर्घटनेच्या अनुषंगाने मा.मंत्री (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली दि.१३.०१.२०२० रोजी झालेली बैठक तसेच मा.मुख्यमंत्री महोदय यांनी राज्यातील सर्व जिल्ह्यातील रासायनिक व धोकादायक उद्योगांचे निरीक्षण करावे असे दिलेले निर्देश, या अनुषंगाने रासायनिक व धोकादायक उद्योगांच्या औद्योगिक सुरक्षेबाबत जिल्हानिहाय समित्या गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

रासायनिक उद्योगांमध्ये होणाऱ्या आगीच्या व स्फोटाच्या घटना पहाता अशा कारखान्यांमध्ये हाताळले जाणारी धोकादायक रसायने, रासायनिक प्रक्रिया हाताळताना संबंधित कारखान्याच्या प्रशासनाकडून होत असलेल्या अनियमितता तसेच विविध कायद्यांची / नियमांची अंमलबजावणी बाबत सदर कारखान्यांच्या सुरक्षितते संदर्भात होत असलेले दुर्लक्ष या सर्व बाबींचा विचार करुन कार्यरत असलेल्या रासायनिक उद्योगांचे तांत्रिक व सुरक्षा विषयक परीक्षण तातडीने करुन त्यामध्ये निदर्शनास आलेल्या त्रुटींची पूर्तता झाल्यावर असे उद्योग पुढे सुरू ठेवण्याबाबत परवानगी देण्यात यावी.

२. राज्यातील विविध जिल्ह्यांमध्ये कार्यरत असलेले व औद्योगिक वसाहतीतील रासायनिक तसेच धोकादायक उद्योगांची सुरक्षा तपासणीसाठी सह संचालक, औद्योगक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे जिल्हानिहाय समिती स्थापन करण्यात येत असून यामध्ये सदस्य म्हणून विविध शासकीय यंत्रणाचे अधिकारी तसेच Institute of Chemical Technology and Indian Institute of Technology, Mumbai (Chemical Engineering Department) यांचे प्रतिनिधी यांचा समावेश करण्यात येत आहे.

**सदर जिल्हानिहाय समितीची रचना खालीलप्रमाणे :-**

| अ.क्र. | पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १. | सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय | अध्यक्ष |
| २. | कामगार उप आयुक्त / सहायक आयुक्त | सदस्य |
| ३. | उप प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ | सदस्य |
| ४. | आयसीटी / आयआयटी मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५. | अग्निशमन अधिकारी,महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ | सदस्य |
| ६. | जिल्हाधिकारी यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ७. | विशेष नियोजन प्राधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ | सदस्य सचिव |

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या औद्योगिक क्षेत्राबाहेरील कारखान्यांबाबत वरील समिती कार्यरत राहील. परंतु, सदस्य सचिव म्हणून संबंधीत जिल्हाधिकारी यांचे प्रतिनिधी म्हणून काम पाहतील.

**समितीचे कार्य पुढीलप्रमाणे.**

१) जिल्ह्यातील धोकादायक व रासायानिक कारखान्यांची यादी सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य यांचेकडून प्राप्त करुन घेणे.

२) जिल्ह्यातील धोकादायक व रासायनिक कारखान्यांची तपासणी करण्यासाठी सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, कामगार उप आयुक्त, उप प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, विशेष नियोजन प्राधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ व अग्निशमन अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांनी संबंधित विभागाच्या अधिनियम व नियमांप्रमाणे सर्वंकक्ष तपासणीचा विहीत नमुना (Checklist) तयार करावा.

३) जिल्ह्यातील धोकादायक व रासायनिक कारखान्यांची तपासणी करण्यासाठी आवश्यक त्या तांत्रिक अधिकारी व कर्मचारी व आयसीटी / आय.आय.टी. मुंबई यांचे प्रतिनिधी यांची पथके गठित करुन तपासणी करुन घ्यावी.

४) कारखाने अधिनियमाच्या अंतर्गत नसलेले किंवा कोणत्याही परवानगी शिवाय कार्यरत असलेल्या रासायनिक / धोकादायक उद्योगांची तपासणी करून अशा उद्योगांना निर्बंध घालण्यासाठी समितीने ठोस उपाययोजना सुचविण्यात याव्यात.

५) जिल्हास्तरावरील सर्व समित्यांनी सहा महिन्यात सर्व तपासण्या पूर्ण करून त्याबाबतचा अहवाल संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाकडे सादर करावा.

**सदर समितीने खालील बाबींची तपासणी करावी:-**

- रासायनिक व धोकादायक कारखान्यांची तपासणी करताना प्रथम सर्व नोंदणी प्रमाणपत्र / आवश्यक परवाने याची तपासणी करावी व ते प्राप्त झाली असल्याची खातरजमा करावी.
- सदर कारखान्यातील अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या सुरक्षा व आरोग्याबाबत पुरविण्यात आलेल्या उपाययोजनांची पाहणी करणे.
- कारखान्यामध्ये उपलब्ध करण्यात आलेल्या अग्निसुरक्षा विषयक बाबींची पाहणी करणे.
- कारखान्यातील अधिकारी व कर्मचारी यांच्या सुरक्षिततेसाठी पुरविण्यात आलेल्या वैयक्तिक सुरक्षा उपकरणांचा आढावा घेणे.
- कारखान्यातील संभाव्य धोके लक्षात घेऊन त्याबाबतची माहिती अधिकारी व कर्मचारी यांना देण्यात आली आहे किंवा कसे याबाबत खातरजमा करणे. तसेच त्याबाबत विविध सुचना फलके संबंधित ठिकाणी लावण्यात आले आहेत किंवा कसे याची तपासणी करणे.
- संबंधित कारखान्यामध्ये कार्यरत असणाऱ्या अधिकारी व कर्मचारी यांच्याकडे सदर रासायनिक व धोकादायक प्रक्रिया हाताळण्यासाठी आवश्यक शिक्षण, प्रशिक्षण व अनुभव असल्याबाबतची खातरजमा करणे.
- सदर कारखान्याच्या उत्पादनासाठी वापरण्यात येणारा कच्च्या मालाचा साठा व तयार मालाचा साठा करण्यासाठी स्वतंत्र जागा उपलब्ध आहे किंवा कसे. तसेच यामध्ये सुरक्षित अंतर कारखान्यापासून ठेवण्यात आले आहे का ? तसेच कारखान्याचा एकूण भूखंड पाहता धोकादायक व रासायनिक पदार्थावर निर्बंध घालण्यात यावे यांची तपासणी करणे.
- कारखान्याच्या एकंदर प्रक्रियेमध्ये काही धोकादायक प्रकिया असल्यास सदर प्रकिया निदर्शनास आणणे.
- कारखान्याच्या विद्युत पुरवठयाबाबत सुरक्षा परिक्षणाचा आढावा घेणे.
- कारखान्याच्या सुरक्षा व आरोग्याच्या दृटीकोनातून नीटनेटकेपणाची पाहणी करणे.
- कारखान्याच्या संभाव्य धोक्यापासून अधिकारी व कर्मचारी यांच्या सुरक्षिततेसाठी तसेच सभोवताली असणाऱ्या उद्योगांच्या सुरक्षिततेसाठी आपत्कालिन आढावा (on site and off site emergency plan) तयार करण्यात आला आहे का ते पाहणे व असल्यास आढावा घेणे.
- निरिक्षणामध्ये काही धोकादायक बाबी दिसून आल्यास त्या निर्दशनास आणणे.
- जिल्ह्यातील धोकादायक व रासायनिक कारखान्यांची गठित पथकांमार्फत तपासणी झाल्यानंतर नियमानुसार सत्वर योग्य ती कार्यवाही करणेबाबत जिल्ह्यातील संबंधित अधिकारी यांना आदेश देणे.

- जिल्ह्यातील धोकादायक व रासायनिक कारखान्यांच्या सुरक्षिततेसाठी औद्योगिक सुरक्षा व आरोग्य, पर्यावरण संरक्षण व प्रदुषण टाळणे, कामगार अधिनियमाची अंमलबजावणी, अग्निशमन अधिनियमाची अंमलबजावणी इ. बाबत स्थानिक उद्योजकांच्या संघटनांबरोबर कार्यशाळा घेऊन उद्योजकांमध्ये जनजागृती करणे.
- रासायनिक व धोकादायक कारखान्यामधील कर्मचाऱ्यांची राज्यविमा महामंडळ यांच्याकडे नोंदणी केली असल्याचे आणि संबंधित कामगारांना कर्मचारी राज्यविमा अधिनियम, १९४८ च्या तरतुदीनुसार आरोग्य सेवा व तदनुषंगिक लाभ प्राप्त होत आहे किंवा कसे हे तपासावे.
- कारखान्याचा व तेथील कामगारांचा विमा उतरविला आहे किंवा कसे याची खात्री करावी.
- राष्ट्रीय हरित न्यायाधिकरण यांनी मुळ अर्ज क्र.८०४/२०१७ मध्ये दिलेल्या आदेशानुसार Hazardous and Other Wastes (Management and Transboundary Movement) Rules, २०१६ चे अनुपालन होत आहे किंवा कसे हे तपासावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००११७१६५७५००७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajendra S Kaurte

Digitally signed by Rajendra S Kaurte
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra S Kaurte
Date: 2020.01.17 16:59:01 +05'30'

**(रा. शा. कौरते)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुबई.
२. मा.उपमुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा.
४. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद.
५. मा.मंत्री (कामगार), मंत्रालय, मुंबई.
६. मा.मंत्री (उद्योग), मंत्रालय, मुंबई.
७. मा.मंत्री (पर्यावरण), मंत्रालय, मुंबई.
८. मा.राज्यमंत्री (कामगार), मंत्रालय, मुंबई
९. मा.राज्यमंत्री (उद्योग), मंत्रालय, मुंबई
१०.मा.राज्यमंत्री (पर्यावरण), मंत्रालय, मुंबई.
११.मा. सदस्य, विधानसभा / विधानपरिषद.
१२.अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.प्रधान सचिव (कामगार), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
१४.प्रधान सचिव (उद्योग), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

१५.प्रधान सचिव (पर्यावरण), पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.आयुक्त (कामगार),कामगार आयुक्तालय, कामगार भवन, बांद्रा (पू.) मुंबई-५१.
१७.सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
१८.संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई.
१९.सर्व संबंधित कामगार उप आयुक्त/सहायक आयुक्त.
२०.सर्व संबंधित सह संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय.
२१.सर्व संबंधित उप प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ.
२२.आयसीटी/आयआयटी, मुंबई यांचे प्रतिनिधी.
२३.उप सचिव (कामगार-४), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२४. मुख्य अग्निशमन अधिकारी.
२५. विशेष नियोजन प्राधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ
२६. निवड नस्ती (कामगार-४).